पंचायत समिती, नवापूर (जि. नंदुरबार) येथील अधिकारी, कर्मचाऱ्यांसाठी शासकीय निवासस्थान इमारत बांधकामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत...

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः** पंसई-२०२१/प्र.क्र.१६७/बांधकाम-४

५ वा मजला, २५ मर्झबान पथ, बांधकाम भवन,

फोर्ट, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१

तारीख : ०७ ऑगस्ट, २०२४

**वाचा:-**

१. **कार्यकारी अभियता (बांधकाम), जिल्हा परिषद, नंदुरबार यांचे पत्र क्रमांकः** जिपनं/बांध/२४९१/२०२१, दिनांक ०७ डिसेंबर, २०२१.

२. **अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नंदुरबार यांचे पत्र क्रमांकः** जिपनं/बांध/४९७/२०२२, दिनांक ०४ फेब्रुवारी, २०२२.

३. **कार्यकारी अभियता (बांधकाम), जिल्हा परिषद, नंदुरबार यांचे पत्र क्रमांकः** जिपनं/बांध/निवास/पीओ-३/१२२६/२०२४, दिनांक ३१ मे, २०२४.

**प्रस्तावना:-**

अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी व कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद, नंदुरबार यांनी उपरोक्त वाचा मधील अनुक्रमांक १ ते ३ येथील पत्रांन्वये पंचायत समिती, नवापूर (जि. नंदुरबार) येथे पंचायत समितीच्या अधिकारी व कर्मचारी निवासस्थान इमारत बांधकामाचा प्रस्ताव सादर केला आहे. सदर प्रस्तावानुसार एकूण १४५९.१८ चौ.मी. इतक्या क्षेत्रफळाची एकूण २४ निवासस्थाने, जिल्हाधिकारी, नंदुरबार यांचेकडील आदेश क्र.२०१६/ब/कक्ष-२/गावठाण/कावि-३४/नंदुरबार, दिनांक २० फेब्रुवारी, २०१७ रोजीच्या आदेशान्वये, गटविकास अधिकारी, पंचायत समिती नवापूर (जि. नंदुरबार) यांचे नावे असलेल्या ०.५२ हे. आर मध्ये बांधण्याचे प्रस्तावित आहे. त्यामुळे पंचायत समिती नवापूर यांच्या मागणी व गरजेनुसार टाईप III प्रकारातील १२ व टाईप IV प्रकारातील १२ निवासस्थानांच्या बांधकामाचा प्रस्ताव सादर केला आहे.

०२. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नंदुरबार यांनी पंचायत समिती, नवापूर (जि. नंदुरबार) निवासस्थान बांधकामाकरीता उपमुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांच्याकडील जॉब नंबर T - DAN /RES -१९ DRG No.१, २ या नमुना आराखड्यावर सन २०२१ - २२ च्या दरसूचीवर आधारीत एकूण रू.८५०.२९ लक्ष किंमतीचे

अंदाजपत्रक सादर केले आहे. सदर अंदाजपत्रक कार्यकारी अभियंता (बां.), जिल्हा परिषद, नंदुरबार यांनी साक्षांकीत केलेले आहे. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नंदुरबार यांनी प्रस्तावासोबत अंदाजपत्रक, नमुना नकाशाची प्रत, जागेचा उतारा, टाईप प्लॅन इत्यादी कागदपत्रे सादर केलेली आहेत.

०३. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नंदुरबार यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या छाननी अंती, पंचायत समिती, नवापूर (जि. नंदुरबार) येथील पंचायत समितीच्या अधिकारी व कर्मचारी निवासस्थान इमारत बांधकामाच्या टाईप III प्रकारातील १२ व टाईप IV प्रकारातील १२ अशा एकूण २४ निवासस्थान बांधकामाच्या एकूण रू.८,५०,२९,०००/- इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

पंचायत समिती, नवापूर (जि. नंदुरबार) येथील अधिकारी व कर्मचारी निवासस्थान इमारत बांधकामाच्या टाईप III प्रकारातील १२ व टाईप IV प्रकारातील १२ निवासस्थाने, अशा एकूण २४ निवासस्थानांच्या बांधकामाच्या एकूण रु.८,५०,२९,०००/- (रूपये आठ कोटी पन्नास लक्ष एकोणतीस हजार फक्त) इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या बांधकामास पुढील अटी व शर्तींच्या अधीन राहून, या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१. पंचायत समिती, नवापूर (जि. नंदुरबार) येथील अधिकारी व कर्मचारी निवासस्थान इमारत बांधकामाच्या रू.८५०.२९ लक्ष इतक्या किंमतीचे अंदाजपत्रक सादर केलेले आहे. तथापि, अद्यावत दरसूचीवर आधारित सविस्तर अंदाजपत्रक संबंधित मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग यांची मंजुरी घेणे बंधनकारक राहील.
२. पंचायत समिती, नवापूर (जि. नंदुरबार) येथील पंचायत समितीच्या अधिकारी व कर्मचारी निवासस्थान इमारत बांधकामाच्या टाईप III प्रकारातील १२ व टाईप IV प्रकारातील १२ निवासस्थानांच्या इमारतींचे बांधकाम ज्या जागेवर करावयाचे आहे, ती जागा प्रथमतः जिल्हा परिषद/पंचायत समितीच्या स्वतःच्या नावावर करून घेणे बंधनकारक राहील.
३. नियोजित निवासस्थान इमारतीचे बांधकाम जुनी इमारत पाडून करावयाचे असल्यास, बांधकाम सुरू करण्यापुर्वी संबंधित अधीक्षक अभियंता, सा.बां. मंडळ, प्रादेशिक विभाग यांच्याकडून प्रथमतः अस्तित्वातील जुन्या इमारतीचे स्ट्रक्चरल ऑडीट करून घेण्यात यावे, त्यानुसार अस्तित्वातील इमारत वापरण्यास अयोग्य असावी.
४. पंचायत समिती, नवापूर (जि. नंदुरबार) येथील पंचायत समितीच्या अधिकारी व कर्मचारी निवासस्थान इमारत बांधकामाच्या टाईप III प्रकारातील १२ व टाईप IV प्रकारातील १२ बांधकामाकरीता, प्रस्तावित करण्यात आलेल्या आराखड्यास बांधकाम सुरू करण्यापुर्वी

प्रथमत: मुख्य वास्तुशास्त्रज्ञ/प्रादेशिक उप मुख्य वास्तुशास्त्रज्ञ यांची मान्यता घेणे तसेच अग्निशमन यंत्रणेची मंजूरी घेणे आवश्यक राहील.

५. विहीत नमुना आराखड्यानुसार कामे हाती घेताना, स्थानिक नगररचना प्राधिकरणाची मंजुरी घेणे बंधनकारक राहील.

६. या कामाच्या सविस्तर अंदाजपत्रकास प्रथमत: सक्षम प्राधिकाऱ्याकडून त्वरेने तांत्रिक मान्यता घेणे बंधनकारक राहील.

७. प्रस्तुत निवासी इमारत बांधकामामध्ये ग्रीन बिल्डींग संकल्पना अंमलात आणून, नैसर्गिक प्रकाशयोजना व वायुवीजन, पाण्याच्या व उर्जेच्या वापरात काटकसर, पर्जन्य जलपुन:र्भरण आणि जास्तीत जास्त पर्यावरणपूरक बांधकाम साहित्य व साधन-सामुग्रीचा वापर करणे आवश्यक राहील.

८. प्रत्यक्ष बांधकाम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही - २०१३ / प्र. क्र. १७७ / तां.क.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

९. प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त दोन वर्षात पूर्ण होईल, असे नियोजन करुन, इमारत बांधकामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबंधित कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी.

१०.या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रशासकीय मान्यता किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबंधित कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी. या कामावर प्रशासकीय मान्यतेपेक्षा अधिक खर्च झाल्यास तो सबंधित पंचायत समिती/जिल्हा परिषदेने सोसावा.

०२. पंचायत समिती, नवापूर (जि. नंदुरबार) येथील निवासी इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढीलप्रमाणे आहे :-

| General Abstract for Construction of Government Quarters Type III & IV at P. S. Navapur, Dist. Nandurbar | | |
|---|---|---|
| **Sr.No.** | **Description of item** | **Cost In Rs.** |
| **1** | (a) Cost of Type III | 26925920.00 |
| | (b) Cost of Type IV | 23697333.00 |
| | **Total work amount** | **50623253.00** |
| **2** | Add 11 % for Electrification | 5568558.00 |
| **3** | Add 8 % for Water supply & Sanitation | 4049860.00 |
| **4** | Add 3 % for Internal Roads | 1518698.00 |
| **5** | Add 4 % for Contingencies | 2024930.00 |
| **6** | Add 2 % for Computrization Charges | 1012465.00 |
| **7** | Add 11 % for Increase in Rate | 5568558.00 |
| **8** | Add for RWH & Fire arrangement | 1000000.00 |
| **9** | Add for Compound wall | 4500000.00 |
| **10** | Add 18 % for GST | 9112186.00 |
| **11** | Add for SQM | 50000.00 |
| | **Total Cost Of Project (TPC)** | **85028508.00** |
| | **Says Rs. Lakhs** | **850.29** |

०३. या कामाच्या सविस्तर अंदाजपत्रकास सक्षम प्राधिकाऱ्याकडून त्वरेने तांत्रिक मान्यता घेण्यात येवून त्याची प्रत शासनास सादर करावी.

०४. उपरोक्त बांधकामासाठी सक्षम प्राधिका-यांची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरुपात, टप्प्या-टप्प्याने निधी उपलब्ध करून दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे (BDS) संबधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना वितरीत करण्यात येईल. यावरील खर्च "२५१५ - इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०५) जिल्हा परिषदांच्या निवासी इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने - (२५१५ १२५६)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

प्रस्तुतचा शासन निर्णय वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उप विभाग-पाच, अ. क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि. क्र. १३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०८०७१५०५०६७३२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASHANT VINAYAKRAO PATIL

Digitally signed by PRASHANT VINAYAKRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9524CAB2D5A858B4A01FF72F5CAE5FDDC4F8C964F3AFC6B6249294AD88EC870D, cn=PRASHANT VINAYAKRAO PATIL
Date: 2024.08.07 16:09:58 +05'30'

**(प्रशांत पाटील)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) मा. विधानसभा व विधानपरिषद सदस्य विधानमंडळ, मुंबई.
२) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
३) प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक.
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नंदुरबार.
६) मा. मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२ नागपूर.
८) अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नंदुरबार.
९) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, नंदुरबार.
१०) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद, नंदुरबार.

११) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा नंदुरबार.
१२) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुबंई.
१३) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा नाशिक विभाग, नाशिक.
१४) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नंदुरबार.
१५) सभापती, पंचायत समिती, नवापूर , जिल्हा नंदुरबार.
१६) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, नवापूर, जिल्हा नंदुरबार.
१७) निवड नस्ती, कार्यासन बांधकाम-४, ग्राम विकास विभाग,मंत्रालय मुंबई.